**नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेमध्ये कार्यरत असलेले श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे, एकत्रित वेतनावरील उप अभियंता यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- नांवाशमनपा-२०१०/ प्र.क्र. ९५ /नवि-२४**
मंत्रालय, ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०२ नोव्हेंबर, २०२१.

**संदर्भ:-** १) नांदेड महानगरपालिका सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. १७१ दि १२.३.२०२१
२) नांदेड महानगरपालिका स्थायी सभेचा ठराव क्र. ११८ दि ३.३.२०२१
३) आयुक्त, नांदेड वाघाळा महानगरपालिका यांचे पत्र क्र. नावाशमनपा/साप्रवि/आस्था-५/२४४३/२०२१ दि. १७.६.२०२१
४) आयुक्त, नांदेड वाघाळा महानगरपालिका यांचे पत्र क्र. नावाशमनपा/साप्रवि/आस्था-५/३६८७/२०२१ दि. १६.७.२०२१

**प्रस्तावना:-**

विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करून नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेतील एकत्रित वेतनावरील उप अभियंता या पदावर कार्यरत असलेले श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांनी केलेली प्रदिर्घ सेवा विचारात घेऊन त्यांना महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील रिक्त उप अभियंता या पदावर कायमस्वरुपी नियुक्ती देण्यास महानगरपालिकेच्या स्थायी सभेने ठराव क्र. ११८ दि. ३.३.२०२१ अन्वये मान्यता दिली आहे.

तसेच महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उप अभियंता या संवर्गातील ४ रिक्त पदांपैकी ३ पदे पदोन्नतीने व १ पद सरळ सेवेने भरण्यात यावे व सदर सरळ सेवेच्या रिक्त पदावर श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांना कायमस्वरुपी सेवेत सामावून घेण्यास महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने ठराव क्र. १७१ दि. १२.३.२०२१ संमत केलेला आहे.

स्थायी समिती व सर्वसाधारण सभेच्या ठरावानुसार श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांना महानगरपालिकेच्या सेवेत उप अभियंता या पदावर नियमित सामावून घेण्याचा प्रस्ताव आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधिन दि. १७.६.२०२१ च्या पत्रान्वये शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला होता. आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांच्या प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने श्री.संघरत्न गणपतराव सोनसळे, एकत्रित वेतनावरील उप अभियंता यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांची नियुक्ती विहित मार्गाने उप अभियंता, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका या पदावर एकत्रित वेतन तत्वावर झालेली आहे. नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी सभेने ठराव क्र.११८, दि.३.३.२०२१ व सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. १७१ दि. १२.३.२०२१ अन्वये दिलेली मान्यता व आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचेकडून संदर्भीय दि.१७.६.२०२१ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव विचारात घेता श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांचे नांदेड वाघाळा शहर

महानगरपालिका आस्थापनेवरील मंजूर व रिक्त असलेल्या उप अभियंता या पदावर खालील विहित अटी व शर्तीनुसार नियमित समावेशन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

१) श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांचे या शासन निर्णयाच्या दिनांकापासून महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्यात यावे.

२) श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी.

३) नियमित सेवेच्या दिनांकापासून त्यांना सेवा जेष्ठता, निवृत्ती वेतन इ.चे लाभ अनुज्ञेय राहतील.

४) समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवाकालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

५) समावेशन करण्यापूर्वी श्री. संघरत्न गणपतराव सोनसळे यांच्याकडून बंधपत्र घेवून त्यामध्ये मागील सेवाविषयक कोणताही लाभ मिळणार नाही. तसेच भविष्यात याबाबत मागणी करता येणार नाही. याचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

६) सदर समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

७) आस्थापना खर्च ३५% च्या मर्यादेत राहील याची दक्षता महानगरपालिकेने घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२१११०२११३२४४२०२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2021.11.02 11:34:08 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महापौर, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका.
२. आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका.
३. मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
४. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
५. निवड नस्ती (नवि-२४).